कृषि विभागांतर्गत असलेले भारतीय विकास लोक कार्यक्रम (भाविलोक) संस्थेचे वाहन क्रमांक MH ०१-V३४३ (TATA SUMO) निरुपयोगी ठरविण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.भाविलोक-२०२१.प्र.क्र.०२/लोलेस (कृषि)**
दि. १६ मे, २०२४

**संदर्भ :** शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई, यांचे क्र. शापसे /वा.त./२०२१/१९९४/ दि.४.१०.२०२१ चे पत्र

**शासन निर्णय :**

भारतीय लोक विकास कार्यक्रम (भाविलोक) संस्थेचे वाहन क्रमांक MH ०१-V३४३ (TATA SUMO) वाहन हे सन १९९७ मध्ये खरेदी करण्यात आले असून, ते खरेदी करुन २६ वर्षाहून अधिक कालावधी झालेला आहे. तसेच हे वाहन २,४०,००० कि.मी. अंतर धावले आहे. सदर वाहनाच्या दुरुस्तीकरीता आतापर्यंत रु.२,२८,००४/- इतका खर्च झालेला आहे.

२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३ / प्र.क्र. ३० /२०१३ /विनियम, वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला, उप विभाग दोन मधील अ.क्र.१९- क नियम क्र. ६९ मधील अट क्र. १) अन्वये वाहनाचे धाव २,४०,००० कि.मी. किंवा आयुष्यमान १० वर्ष यापैकी आयुष्यमान १० वर्षे ही अट पुर्ण करीत आहे. त्यामुळे अशा परिस्थितीत वाहनाची सद्य:स्थिती, दुरुस्तीवर झालेला खर्च, वाहनाची खरेदी किंमत, अपेक्षित दुरुस्तीवरील अंदाजे खर्च, भविष्यातील दुरुस्त्या या बाबी विचारात घेता, वाहन क्रमांक MH ०१-V३४३ (TATA SUMO) हे दुरुस्ती करुन वापरात ठेवणे आर्थिकदृष्ट्या किफायतशीर ठरणार नाही, असे अभिप्राय शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भित पत्रान्वये कळविले आहे. सबब सदर वाहन या शासन निर्णयाद्वारे निरुपयोगी ठरविण्यात येत आहे. वाहनाचा तपशिल सोबतच्या विवरणपत्रात दर्शविण्यात आला आहे.

३. सदर शासन निर्णय क्र.विअप्र -२०१३/प्र.क्र.३०/२०१३,दि.१७ एप्रिल, २०१५ मधील विनियम वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.१९-क, नियम क्र.६९ मधील अट क्र. (१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१६१५४५१८३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.05.16 15:58:50 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.प्रधान सचिव (कृषि) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास,व मत्स्यव्यवसाय विभाग मंत्रालय, मुंबई
२) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई

३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,  मुंबई
४) नियंत्रक , शासकीय परिवहन  सेवा, वरळी, मुंबई ४०००३०
५) वित्त विभाग (व्यय-४) विनियम, मंत्रालय मुंबई ४०००३२
६) निवडनस्ती लोलेस (कृषि)

कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र. वाहन २०२३/प्र.क्र. ०२/२०२१/ लोलेस (कृषि)
दि. १६ मे, २०२४ सोबतचे विवरणपत्र

| | | |
|---|---|---|
| १ | इंजिन नंबर | ४८३ DLHI FRQ७३८७८३ |
| २ | चेसीस नंबर | ३८५००३ FRQ ९१४१०४ |
| ३ | खरेदीचे वर्ष | १९९७ |
| ४ | अतापर्यंत धावा | २,४०,०००/- |
| ५ | रंग | पांढरा |
| ६ | मॉडेल | टाटा सुमो |
| ७ | वाहन निकाली काढण्याठी कारणे | वाहन खरेदी जून १९९८ मधील असून २६ वर्ष झाली आहेत. दि.१०.४.२०२१ पासून चालविण्यास योग्य नाही असे शासकीय परिवहन सेवा,वरळी मुंबई यांचे पत्रान्वये कळविले आहे. |
| ८ | वाहन ज्या कार्यालयाच्या ताब्यात आहे त्या कार्यालयाचे नाव | कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई<br>(भारतीय विकास लोक  कार्यक्रम) |
| ९ | वाहनाचे नोंदणी नंबर व अद्याक्षरे | एमएच ०१-व्ही -३४३ (टाटा सुमो) |